**मा. मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधी**
**मधून अर्थसहाय्य मंजूर करणेबाबत.**
**(सन २०१५-१६).**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सीसीएफ-१०१३/प्र.क्र.२१२/२०१३/२५**

मुख्य इमारत, ३ रा मजला, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २८ ऑक्टोबर, २०१५.

वाचा —

१) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र. पीडीसी-१०६९-१३५१४-बी, दि. २७/०८/१९६९.

२) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र. पीडीसी-१०६९/१३५१४-बी, दि. ०८/१०/१९७०.

**शासन निर्णय-**

मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीचे संपूर्ण नियंत्रण, व्यवस्थापन व प्रशासन मा. मुख्यमंत्री यांच्याकडे निहीत आहे. मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधी हा मा. मुख्यमंत्री महोदयांचा स्वेच्छाधिकार असून महाराष्ट्र राज्यातील किंवा राज्याबाहेरील सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, धर्मादाय किंवा तत्सम सार्वजनिक किंवा निमसार्वजनिक संस्था किंवा संघटना यांना या निधीतून अर्थसहाय्य देण्यात येते. त्यानुसार संकल्प स्वयंसेवी सामाजिक संघटना, नागपूर यांना दि. २१ ते २३ ऑक्टोबर, २०१५ या कालावधीत धम्मचक्र प्रवर्तन दिन सोहळा कार्यक्रमासाठी येणा-या भाविकांसाठी विविध उपक्रम राबविण्याकरीता रु. २५,००,०००/- (अक्षरी रुपये पंचविस लाख फक्त) इतके अर्थसहाय्य मंजूर करण्यात येत आहे.

२. संबंधित संस्थेने केलेल्या अर्जाप्रमाणे, त्यांनी ज्या प्रयोजनार्थ निधीची मागणी केली आहे त्या प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करावा आणि खर्चाच्या अनुषंगाने “सनदी लेखापाल” (Chartered Accountant) यांनी प्रमाणित केलेले उपयोगिता प्रमाणपत्र निधी प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत सादर करावे. तसेच संबंधित नोंदणीकृत संस्थांने नियमानुसार संस्थेचे लेखापरिक्षण करुन लेखापरिक्षण अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर निधी शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१०१०/प्र.क्र.६८/कोषा प्र-५, दि.१८ एप्रिल, २०११ मधील तरतुदीस अनुसरुन मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीच्या स्वीयप्रपंजी (PLA) लेखा खाते क्र. ६१८४०३६००६ (०१५१४५०१०८९) मधून संकल्प स्वयंसेवी सामाजिक संघटना,

नागपूर या सामाजिक संस्थेच्या संबंधित युनियन बँक ऑफ इंडिया, शांती नगर, नागपूर येथिल बचत खाते क्र. ५१७२०२०१०००५३७० मध्ये विहीत कार्यपद्धतीनुसार जमा करण्यात यावा.

४. उपरोक्त शासन निर्णय दि. २७/०८/१९६९ व दि ८/१०/१९७० च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार मा. मुख्यमंत्री महोदयांचे मान्यतेनंतर निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२८११०३२३८२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivji Tukaram Dhamankar

Digitally signed by Shivji Tukaram Dhamankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4272a9eacd83519296781a1ecad5c4f1a6fc8983669dcd236ae7ed270c73b725, cn=Shivji Tukaram Dhamankar
Date: 2015.11.05 11:24:03 +05'30'

**( शिवाजी तु. धामणकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे, सचिव राजभवन, मुंबई.

२) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.

४) महालेखापाल, महाराष्ट्र (१/२), लेखा व अनुज्ञेयता,मुंबई/नागपूर.

५) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.

६) निवासी लेखाधिकारी, मुंबई.

७) उप सचिव (कोषा प्र-५/अर्थ-३),वित्त विभाग, मंत्रालय,मुबई.

८) धर्मादाय आयुक्त कार्यालय, नागपूर.

९) अध्यक्ष, संकल्प स्वयंसेवी सामजिक संघटना नागपूर.

१०) निवडनस्ती.